अहमदनगर जिल्हा कारागृह, नारायणडोह या प्रस्तावित नविन कारागृहाकरिता संपादीत करण्यात आलेल्या क्षेत्राच्या मोबदला खर्चास प्रशासकीय मंजूरी देण्याबाबत..

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

**शासन निर्णय क्रमांक: जेएलएम ०१२५/प्र.क्र.३८/तुरुंग-२**

**दुसरा मजला, मुख्य इमारत,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

दिनांक : ११ मार्च, २०२५.

संदर्भ-

१. अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे क्र.इप्रवि/नारायणडोह/अनुदान मागणी/८९६६/२०२४/ कक्ष क्र. ६ (२) पुणे-१, दिनांक २३.१०.२०२४ रोजीच पत्र,
२. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग -२, दिनांक २०.०९.२०१९,
३. गृह विभाग, शासन निर्णय क्र. जेएलएम ०६२३/प्र.क्र.१००/तुरुंग-२, दिनांक ५.१२.२०२३.

प्रस्तावना-

नविन प्रस्तावित अहमदनगर जिल्हा कारागृह, नारायणडोह करिता संपादीत करण्यात आलेल्या क्षेत्राचा मोबदला अदा करण्याकरिता अनुदान उपलब्ध करुन देण्याबाबत संदर्भीय क्र.१ अन्वये अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी विनंती केली आहे. त्यास अनुसरुन सदर खर्चास प्रशासकीय मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

अहमदनगर जिल्हा कारागृह, नारायणडोह या प्रस्तावित नविन कारागृहाकरिता संपादीत करण्यात आलेल्या भूक्षेत्राच्या मोबदला खर्चास खालील विवरणपत्रात नमूद केल्यानुसार या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे.

| अ.क्र. | कारागृहाचे नाव | अनुदान आवश्यकतेचे कारण | रक्कम रुपये |
|---|---|---|---|
| १ | अहमदनगर जिल्हा कारागृह, नारायणडोह | गट क्र.४६९ मध्ये निवासी व कार्यालयीन इमारतीचे बांधकाम करणेसाठी भुसंपादन या सार्वजनिक प्रयोजनासाठी खाजगी क्षेत्रातील मौजे निंबोडी ता.जि. अहमदनगर येथील संपादीत करण्यात आलेल्या क्षेत्राचा मोबदला अदा करण्यासाठी (खाजगी भुखंडाकरिता रु.८,७२,४७१/- व जागा मोजणी शुल्क रु.७६,०००/-) | रु.९,४८,४७१/- |
| एकूण (अक्षरी रुपये नऊ लक्ष अठ्ठेचाळीस हजार चारशे एक्काहत्तर फक्त) | | | रु.९,४८,४७१/- |

२. यावरील होणारा खर्च सन २०२४-२५ या वित्तीय वर्षात “मागणी क्र. बी-१०, ४०७०, इतर प्रशासनिक सेवांवरील भांडवली खर्च, (००) (८००) इतर खर्च (००) (००) (०७) पोलीसांकरीता भूसंपादन

आणि इमारतीचे बांधकाम यावरील खर्च (४०७० ०१४२) (कार्यक्रम) ५३- मोठी बांधकामे" या लेखाशिर्षाखाली मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व सदर अनुदान खर्चाबाबतचे मासिक विवरणपत्र व उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करण्यात यावे.

३. हा शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक २०.९.२०१९ चे परिशिष्ट "अ" वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग-पहिला, उपविभाग-पाच, अ.क्र.१ नुसार महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र.१३४(३) अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान केलेल्या पूर्ण अधिकारानुसार सक्षम प्राधिकारी यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२५०३१११२४५१९२१२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

SUGRIV SAMBHAJI DHAPATE

Digitally signed by SUGRIV SAMBHAJI DHAPATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=d02297f9b5e889636956e39bfae4ea112e908c0e9a7e572d4190f9709a817f51, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=FC102DE27DC1B41E747AC6CBB491C4209459C3CF340720EA98FD1D95B19C9F65, cn=SUGRIV SAMBHAJI DHAPATE
Date: 2025.03.11 12:46:25 +05'30'

**(सुग्रिव धपाटे)**
**सह सचिव, गृह विभाग**

**प्रत,**

१. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर,
२. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
३. प्रधान सचिव (अ. व सु.), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
४. अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे,
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
६. कारागृह उपमहानिरीक्षक, नाशिक विभाग,
७. निवासी लेखा परीक्षा, मुंबई,
८. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
९. जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर,
१०. कक्ष अधिकारी, अर्थ-१, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
११. कक्ष अधिकारी, पोल-७, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
१२. अधीक्षक, अहमदनगर जिल्हा कारागृह,
१३. निवड नस्ती, तुरुंग -२ कार्यासन, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.

//**//